# भटकंतीची धुळवड

लेखन - सचिन काकडे



- कोकण बाईक राईड..
- ४ दिवस ..
- ४ देवस्थाने..
- २८ किल्ले ..

| | | |
|---|---|---|
| ई - पुस्तक | : | भटक्यांची धुळवड |
| लेखन - संपादन | : | सचिन काकडे, मुंबई. |
| संपर्क | : | ९५९४५६६६७६. |
| ई – मेल | : | sachinkakade@lastbench.co.in |
| प्रकाशन | : | ई साहित्य प्रतिष्ठान |
| कॅलिग्राफ़ी | : | अमृता ढगे, अंबरनाथ. |
| ट्रेक ग्रुप | : | साधे सुधे ट्रेकर्स. |
| छायाचित्रे | : | विशाल नायकवडी, निलेश सकुंडे, संकेत साळुंखे. |
| विशेष सहाय्य | : | सुरज सकपाळ, पनवेल. |



www.esahity.com
esahity@gmail.com
eleventh floor, eternity
eastern express highway
thane, 400604.

# प्रस्तावक अर्पण

रंग काळ्या कातळाचा... रंग तट बुरुजांचा... रंग गाठीला असल्या जिद्दीचा.. रंग पाठी बांधल्या हद्दीचा.....रंग सह्याद्रीचा... रंग सागरतटांचा... रंग बेभान लाटांचा...रंग गड किल्ल्यांच्या वाटांचा... त्यावर कोरल्या इतिहासाचं वेड उरात आणि भगवा करात घेतल्या वादळाचा... रंग आयुष्य उशाला घेऊन गड किल्ल्यांच्या कुशीतल्या चाँदण्या रात्रीचा... रंग तिच्या सोबत जागल्या आणि जगल्या मैत्रीचा..



**✻ जय शिवराय ✻**

स्वराज्याच्या अभेद्य आरमाराच्या 'तांबडया' वाटेवर... ४ दिवस...९ बाईक्स, १८ ट्रेकर्स, ४ देवस्थाने, ५ जिल्हे, २६ किल्ले. मुंबई – कोकण – गोवा – कर्नाटक – कोल्हापूर - मुंबई असा १४५८ किलोमीटर प्रवास...

ही "भटक्यांची धुळवड" स्वराज्याच्या तसेच भारतीय आरमाराचे जनक "Father Of Indian Navy" छत्रपती महाराज शिवरायांना. आणि स्वराज्यातील आरमाराच्या अभेद्यतेसाठी एकनिष्ठ लढलेल्या सर्व ज्ञात-अज्ञात मावळ्यांना

अर्पण...!!

# ৩ पूर्वतयारी..

गेल्या धुळवडीतला वर्षभर न उतरलेला नळीची वाट , हरीश्चंद्र, तारामती शिखर आणि साधले घाटाचा रंग… सहा महिन्यापासून भटक्यांच्या विषयात आलेली 'कोकण' मोहीम…तिला खुणावणारी उगवत्या आभाळाच्या रंगांची, नागिणीच्या अंगांची..निळ्याशार दर्याच्या पांढऱ्या फुंकर लाटा चुकवत…छत्रपतीं महाराजांच्या स्वप्नातल्या आरमाराचा रुबाब.. स्वराज्याच्या दिमाख मिरवत.. उभ्या सागरी किल्ल्यांना… पुऱ्या तीन जिल्ह्यांना जोडणारी कोकणाची 'तांबडी' वाट…

एकाला एक जोडुन आलेल्या सुट्ट्यांसारखाच जोडलेले …. गेल्या ठरावात सहभागी पण नेमका या वेळेस बोटीवरुन हुकुम आल्याने ब्राझीलमधल्या 'रिओ' त रुजु व्हायच्या आधी जड दिलाने "दर्यासारंग" विक्याने (विक्रांत गायकवाड) सुपूर्द केलेला पहिला आणि सुहास पवार कडुन दुसरा असे कोकण दुर्गसफ़रीचे नकाशे… विलास दादांनी त्यात परतीच्या वाटांवर जोडलेले आणखी दोन जिल्हे आणि तीन किल्ले … सगळ्या ट्रेकर्स ग्रुप वर आबाने पोहोचवलेली मोहीमेची वार्ता … एक दोघं म्हणता म्हणता मोहिमेत सहभागी १७ – १८ पोरं आणि त्यांच्या गाड्या … ठरलेल्या जोड्या…. किलोमीटर्स चा खेळ… लागणारा वेळ …. खर्चाची गणितं , ठरलेली कॉंट्री, पेट्रोलचा हिशोब… दोन दिवस फोनवर विलास दादांशी आणि आदल्या दिवशी प्रत्यक्ष भेटुन आबासोबत मोहिमेचे खलबत…. २६ किल्ल्यांची माहिती … मोहिमेचे प्रयोजन अधिक चार दिवसाचे नियोजन …. Google Map Route गिरवत आणि डोक्यात फ़िट केलेला मोहिमेचा आराखडा फ़ायनल झालेल्या १७ जणांत फ़िरवत …



**आबासाहेब कापसे** , मुलुंड
मोहीमेचे शिलेदार, अर्थमंत्री

अखेर निघायचंच असं ठरलं…..

# ६० आदली रात्र..

दिवसभरातली  फ़ोनाफ़ोनी...  निघायची उत्सुकता ... तयारीची शहानीशा ...उगाच लांबत चाललेली संध्याकाळ, ऑफ़िस सुटल्यावर घरापर्यंत ताणलेली गाडी... घरी येऊन दोन घास खाऊन बॅगेत भरलेला चार दिवसाचा संसार ...एरीयातल्या होळीला प्रदक्षिणेत नमस्कार .. गाडीला दिलेला सेल्फ़ आणि सगळ्यांनी जमायचं ठिकाण ठरलेल्या बेलापुरकडे प्रस्थान ...अगदी पुराणातही कुठल्याश्या अध्यायात लिहिल्यागत १० ची वेळ दिलेली असली तरी शेवटचं कुणी न कुणी १२ पर्यंत येणं.. त्यांनी नको असलेली कारणं देणं.. मग ती दिल्यावर यथेच्छ शिव्या खाणं... नित्यनेम पार पडलेले असे सगळेच सोपस्कर.. मुंबईतून निघणाऱ्या ८ पैकी ७ गाड्य़ांवर मागे बसणा-यांना गाडी चालवता येत नाही..

हे कळल्यावर गेलेली .. आणि “आता आपलं ठरलंय तर ठरलंय” म्हणत टायर मधे पेट्रॉल सोबत भरलेली हवा.... निघतानाचा फोटो... सोडायला म्हणुन आलेल्या वाडकरांनी दिलेला 'जपुन जा दोस्तहो' हा काळजीचा निरोप घेत १६५ किलोमीटर चा पहिल्या मुक्कामाचा टप्पा “श्रीवर्धन” साठी  कूच...

दिड ला वडखळ ..तीन ला माणगावात घेतलेला चहा.. चार ला श्रीवर्धनला पोहोचायच्या आधी आमच्यापर्यंत पोहोचलेला गारठा ... चेक पोस्ट वरल्या पोलीस काकांशी गप्पा.. रात्रीच्या त्यासमयातही न कंटाळता त्यांनी केलेली संपुर्ण तपासणी..  सतर्कता... शंकर बापुंच्या चुलत भावाने श्रीवर्धन ला सगळ्यांच्या मुक्कामाला केलेली फ़ाईव्ह स्टार सोय... वाघोलीवरुन त्या संध्याकाळीच पोहोचलेला आणि उशाला किल्ल्यांच्या अभ्यासाचं पुस्तक घेऊन यथेच्छ दोन प्रहर झोप काढणारा आमचा १७ वा गडी विशाल नायकवडी... आणि उरल्या शेवटच्या प्रहराची सराव पडल्या अंगाला थोडीफ़ार झोप म्हणुन आपापली गादी-उशी घेऊन पहाटेच्या कुशीत शिरलेले सगळे फ़ंटर..



**विलास घाटगे** , करी रोड
मोहीमेचे शिलेदार, GPS दादा

# दिवस पहिला

ज्याच्या त्याच्या ऑफ़िसच्या टायमिंग ने वाजलेले.. आणि झटक्यात snooze mode वर गेलेले आलार्म… पण सवय नसलेल्या कोंबड्याच्या आरवाने आलेली जाग.. Calculation मधे अर्धा तास वाढीव झोप झाल्याने सगळ्यांची आवराआवरीची घाई… गीझरचं गरम पाणी.. आधी एक – एक नंतर एकाच बाथरुम मधे तिघं-तिघं अशा उरलेल्यांनी उरकलेल्या अंघोळी.. शंकर बापुंच्या वहीनींनी सगळ्यांसाठी केलेला इडली-सांबार-चटणी- असा सरंजाम बेत.. त्यावर तुटुन पडलेली पहिल्या दमाची फ़ळी… मग त्या माऊलीने दिलेला उरली सुरली झोप उडवणारा मसालेदार गरम गरम चहा…

आजचा पोटोबा नंतरचा विठोबा श्रीर्वधन पासून ९ किलोमीटर अंतरावर असलेला “दक्षिण काशी” म्हणजेच "हरिहरेश्वर" हरिहरेश्वर सह कालभैरव योगेश्वरी, सिद्धिविनायक, मारुती, किनाऱ्यावरचे विष्णुपद, गायत्रीतीर्थ, वक्रतीर्थ, सूर्यतीर्थ, यज्ञकुंड, विष्णुतीर्थ अशा पावन दर्शन आणि नमस्कारानंतर … पुन्हा घोटभर चहा-वडापाव.. मग थेट हर हर महादेव गर्जनेत ५ किलोमीटरवर गाठलेली "बागमांडला जेट्टी"... तासाला एक अशा वेळापत्रकात आलेल्या फेरीच्या बोटीत चढवलेल्या गाड्या... पुढच्या १५ व्या मिनिटाला४ गाठलेलं "वेशवी" गाव... गावातल्या वाल्मीकीनगरात भरलेली मंडपी थाटाची गोट्यांची अनोखी टुर्नामेंट... तिथल्या माईकवर चाललेलं त्या स्पर्धेचं समालोचन ऐकायला थांबवलेली बाईक ..आठवलेलं लहानपण आणि तिथल्या वेगळेपणाचं "क्या बात" कौतुक... तिथली Match आणि पुढे किल्ल्यापर्यंत गाड्या चढवतानाचा अवघड वळण Patch संपवत गाठलेला किल्ले बाणकोट....





**शंकर सापते** , नेरूळ
मोहीमेचे शिलेदार, म्होरके



**संकेत साळुंखे** , डोंबिवली
मोहीमेतला गुंडा



**सुबोध साळुंखे** , ठाणे



**विशाल नायकवडी** , वाघोली
फ़ोटोग्राफ़र

# १.किल्ले बाणकोट

महाबळेश्वराने कोकणात दिलेल्या लेकीसारखी सावित्री नदी... तिच्या आणि सागराच्या संगमावर खाडीचं रक्षण करत शतकानुशतक उभा ग्रीक प्रवासी प्लिनीने पहिल्या शतकात नोंदवला “मंदगोर” तथा "मंदारगिरी" , कोन्हीजी आग्रेंनी जिंकल्यावर नावाजलेला "हिंमतगड" ... पेशवे आणि ईंग्रज या अभद्र संयुक्ताने तुळाजी आंग्रे कडुन बळकवल्यावर " फोर्ट व्हिक्टोरीया" म्हणवून घेत नंतर इंग्रजांनी पेशव्यांना उसना आहेर केला.. तोच गिरीदुर्ग "बाणकोट" किल्ला.



या इतिहासाला असलेला पायथ्याच्या गणपती मंदिरापासून .. चहु बाजुंनी जांभ्या दगडात कोरून काढलेला खंदक.. पुढे दगडी महिरपाचा उत्तराभिमुख दरवाजा त्याच्या मागे आत बाजूस पहारेक-यांच्या देवडया, उजव्या हाताच्या देवडीत पाण्याचे सहा हौद.... नगारखान्यापर्यंतचा सुबक जिना... पूर्व-पश्चिम दिशेला तटावर पोहोचणारे २ जिने... पश्चिमेकडल्या तटाबाहेरील बुरूजातली पहारेक-यांसाठी खोली... बुजलेली विहीर.... वेळासच्या वाटेवर सिद्दी ने बांधलेला गुप्त दरवाजाचा "पाणबुरूज" हा छोटेखानी भूगोल.... थोडाफार फोटोचा क्लिकक्लिकाट आणि दिवसातला दुसरा किल्ला "हर्णे" कडे प्रयाण.





बाणकोट सोडल्यावर... पुढे राहून वाट शोधत... जीपीएस जबाबदारीचे म्होरके विलासदादा, शंकर बापू आणि मी.... मध्ये इतर रायडर्स... मागे शेवट सगळ्यांच्या काळजीला आबा... मागे असलेला रायडर आरश्यात दिसलाच पाहिजे.... तसा ठरवलेला नियम... संयमी वेग... मागे बसणा-यांच्या ओवरटेक करताना, घाटदार वळवणावर मागून येणाऱ्यासाठीच्या खुणा... एककलमी सुसूत्रता, सुसंगता अशा नियोजनात केळशी ते आंजर्ला ५० किलोमीटर

सुसाट राईडलेलं हर्णे बंदर... तिथली दृष्टीक्षेपातली दुर्ग चौकडी त्यातला पुढारी शोभणारा सूवर्णदुर्ग, त्याला कवच असे फत्तेगड, कनकदुर्ग, आणि हर्णे (गोवा किल्ला)...



गाड्या बंदरावरच लावत ...तिथल्या बोट वाल्याशी मोहिमेचे अर्थमंत्री आबासाहेबांच्या वाटाघाटी संपल्यावर "सुवर्णदुर्ग" च्या भेटीसाठी किनाऱ्याला पुढच्या पाचव्या मिनिटाला लागलेल्या दोन नौका ... आधे इधर आधे उधर च्या फ़ॉर्म्युल्यात विभागले सब सिपाही... शिमग्यानिमित्त तिथल्या कोळी बांधवांचा उत्सव .. उत्साह.. नावेचे पुजन.. आसमंती जयजयकार... नजरेच्या टप्प्यानंतर जवळ येत चाललेला तरण्याबांड मावळ्याच्या अफ़ाट रांगड्या रुपाचा देखणा "सुवर्णदुर्ग" ...





किनाऱ्यापासून विसाव्या मिनिटातला त्याच्या पायाशी रुतलेल्या दगड धोंड्यांशी टेकलेल्या.... "बॅगा ठेवा इथंच.. तुम्ही या जाऊन काळजी नका करु .. पण लवकर या" अशी हमी देत.. आम्ही उतरल्यावर नावाड्यांनी चार पाऊल अंतर पुढं जाउन समुद्रात नांगर टाकुन पार्क केलेल्या दोन्ही नौका...

## २. किल्ले सुवर्णदूर्ग

शिलाहारांनी बांधलेला ...सोळाव्या शतकात आदिलशाहीत असलेला, १६६० मधे शिवरायांनी ताब्यात घेत बळकटी दिलेला... स्वराज्यातल्या अचाट बांधकाम, कारागीरी.. कौशल्याची छाप उमटलेला इतिहासाचा सोनेरी साक्षीदार ... १६८८ मध्ये मुघल सरदार सिद्दी कासीमचा वेढा... त्याला फ़ितुर खासा किल्लेदार अचलोजी मोहीते.... ही खबर लागताच किल्ल्यातल्या सहकारी मावळ्यांना सोबत घेत उण्यापुऱ्या २० वर्षाच्या स्वराज्यनिष्ठ तरुणाने किल्लेदाराला कैद करत केलेला बंडखोरीचा अयशस्वी प्रयत्न... मग मुघलाच्या कैदेतून शिताफीने सुटका करून घेत उरातल्या जिद्दीसकट त्याने पुन्हा पोहत गाठलेला किल्ला... त्याने इतर मावळ्यांचा वाढलेल्या आत्मविश्वासासकट पावसाळ्यापर्यंत लढवलेला

गड... मराठ्यांचा हा चिवटपणा पाहून सिद्दीने उठविलेला वेढा. या असामान्य कर्तुत्वाने पुढे येणाऱ्या काळात ‘‘समुद्रावरील शिवाजी’’ ओळखला गेलेला... त्यापुढील १२ वर्षे किल्लेदार राहत इतिहास सोनेरी कारकीर्द गाजवणारा तो तरुण म्हणजेच स्वराज्याच्या आरमाराचे प्रमुख 'सरखेल कान्होजी आंग्रे' .. पुढे १७५५ मध्ये पेशवे व इंग्रजांच्या संयुक्त सैन्याने जिंकुन घेतलेला ...१८०२ साली यशवंतराव होळकरांच्या भीतीने सैरावैरा पळणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाला आश्रय झालेला तोच हा जलदुर्ग "किल्ले सुवर्णदुर्ग "



एकुण १५ बुरुजांच्या गडाला पूर्वेस उत्तराभिमुख ‘‘गोमुखी" दरवाजा... त्या समोर वाळूची पुळण त्यातल्या तोफा... उजव्या तटावरचं स्वराज्यातील किल्ल्यांचं बलस्थान  मारुती.... पायरीवर कोरलेले कासव ... गोड पाण्याच्या विहीरी , तलाव ... वाड्याचे उध्वस्त अवशेष ... दोन कोठारं..गडाच्या पश्चिमेचा गुप्त दरवाजा.. किल्ल्याच्या तटावरुन दिसणारे फत्तेगड, कनकदुर्ग, आणि हर्णे आणि निसर्गाचं विहंगम दृश्य पाहत..  इतिहासाच्या पाऊलखुणांचे ठसे गिरवत एक उनाड सफ़र....







नावाड्याच्या हाका ऐकू आल्यावर नौकांच्या दिशेने निघालेली पाऊले... निळ्याशार सागरातल्या पाण्याचे ठिपके देहावर पडत असताना आमच्या आणि इतिहासात स्वराज्याच्या पाठीशी खंबीर उभ्या किल्ले सुवर्णदुर्गाला निरोप देऊन पुन्हा बंदर गाठल्यावर अवघ्या काही मिनिटांवर असलेल्या कनकदुर्गाच्या भेटीस पायी निघालेले भटके...

# ३. किल्ले कनकदुर्ग

सुवर्णदुगाच्या दिमतीला एकाच कातळाच्या उंचवट्यावर बांधलेला कनकदुर्ग... गडावरच्या पायरी वाटा... डाव्या दिशेचा काळ्या पाषाणातला भक्कम बुरुज .... कातळमाथ्यावर उरलेली थोडीफ़ार तटबंदी, किल्यावरचं लाईट हाऊस, त्या लाईटहाऊस मधे काम करणा-यांची घरं... इतिहासाची साक्ष देत अजून तग धरुन असलेला किल्ले कनकदुर्ग...

गड पाहिल्यावर कोकम सरबताचे प्रत्येकी दोन दोन ग्लास उडवत "चलो फ़त्तेगड" म्हणत फ़त्तेगडाकडे वळलेला मोर्चा.....



# ४. फत्तेगड किल्ला

शिवकालानंतरच्या जंजिरेकर सिद्दी खैरातखानच्या उभारणीतला... त्यानंतर कान्होजी आणि मानाजीं च्या माघारी तुळाजींनी ताब्यात घेतलेला... पेशवे- आंग्रें वितुष्टात इंग्रजांच्या हाती गेलेला ..नंतर पेशव्यांना दान झालेला... सद्यकाळात दर्याकडली तटबंदी ... कनकदुर्गाकडे निघणारा दगडी पुल.. इतकेच अवशेष उरलेला.. उरल्या सर्वत्र परीसरात कोळ्यांची वस्ती... तिचे "कोळीवस्ती फ़त्तेगड" असे नाव असलेला...पाऊण हेक्टरी किल्ला "फत्तेगड" ...

१५ मिनिटात ही भटकंती आटपून या बंदरावरील चौकडीतला आणि सुवर्णदुर्गाला च्या रक्षणासाठी बांधलेल्या त्रयीतला शेवटचा किल्ला किल्ले हर्णे आणि पुढच्या वाटांसाठी गाडीला दिलेले सेल्फ़....

# ५. हर्णे (गोवा किल्ला)

फ़त्तेगड , कनकदुर्गापेक्षा विस्ताराने मोठा आणि बऱ्या स्थितीतला . जमिन आणि सागरदिशेच्या दुहेरी दरवाजाचा हर्णे किल्ला … ….दरवाज्यातल्या चौथऱ्याच्या तळाला वाघआकृती . डाव्या दरवाजावर द्विमुखी गरुड "गंडभेरुड"… त्याने पायात पकडलेले चार हत्ती …. ३ कुत्र्यांनी एकमेकांचे गळे आपापल्या जबड्यात.. आणि पायात दोन दोन हत्ती…त्या हत्तींनी आपापल्या सोंडांनी दुसऱ्या हत्तींच्या पकडलेल्या शेपट्या असे शिल्प … किल्ल्याच्या तटावरची मारुतीची मुर्ती …. पाय-यां असलेली पाण्याची विहिर… आणि बालेकिल्ला अशा भक्कम अवशेषांचा "किल्ले हर्णे उर्फ़ गोवा" किल्ला….

हर्णे पाहणीनंतर लागलेल्या भुकेने थेट असुद मार्गे १६ किलोमीटरवर गाठलेली दापोली… पोटाला आधार म्हणून





मागवलेली शाकाहारी थाळी… जेवताना सुत्रधार आबाने दाभोळ जेट्टी वर फोन करुन काढलेली माहीती … जेवणं आटपून पाऊन तासाला एक असलेल्या पुढच्या सव्वा पाच च्या फ़ेरी बुकींग साठी पुढे गेलेले अर्धे वीर.. गार सोलकढी च्या तीन वाट्या संपवत… २७ किलोमीटर असल्या दाभोळ जेट्टी कडे…फ़ेरी चुकु नये म्हणून जळगाव – माले – दाभोळ – दाभोळ जेट्टी अशा सुस्साटल्या लागोपाठ गाड्या…

तरी नेमक्या पाच मिनिटाच्या फ़रकाने वेलदुर कडे जाण्यास हुकलेली फ़ेरी.. मग त्या जेट्टीच्या उताराला गाड्या लावल्या लावल्या अंग टाकून पडलेली पोरं… घरी लागलेले… घरुन आलेले.. ख्याली खुशालीचे… रंगपंचमीची दुपार आणि "दुपारची" ओसरल्याने मित्रांचे आलेले सालाबादप्रमाणे या दिवशी एरीयात होणाऱ्या राड्यांचे फोन.. दोन चार शिव्या… ही नको असलेली विश्रांती संपल्यावर आलेली फ़ेरी … त्यात गाड्या टाकून वरच्या माळ्यावर कातरवेळी…… सनसेट म्हणतात तो पहायला जागा अडवून बसलेले संक्या , विलासदा, इश्ल्या, आबा, शंकरबापू, सुरज्या, आकाश , जीतु , किरण, जयेश , यांच्या सगळ्यात निवांत केबीन शेजारी बॅगांच्या ढिगाऱ्यात १५ मिनिटांची झोप काढणारे सुबोध आणि नीरज…. मागच्या फ़ेरी वर असुनही न घेतलेल्या चहाची नेमकी या फ़ेरी वर सगळ्यांना लागलेली तल्लफ़ त्याएवजी त्या काकांनी देऊ केलेली कुल्फ़ी ..पण आम्हाला देताय तर फ़क्त "फ़णसाची कुल्फ़ी द्या"

असा पोरांनी  धरलेला गमतीचा हट्ट.... फ़ेरीने पोहोचवलेलं वेलदुर गाव.... तिथं उतरल्यावर ८ किलोमीटरवर अंजनवेल आणि त्या गावात असलेला "गोपाळगड कुठल्या दिशेला ?" विचारायच्या आधीच पोरांचे 'अवतार' आणि गाड्य़ांचे नंबर पाहुनच किल्ल्याकडे जायला 'हिकडसुन लेफ़्ट जावा मग पुढसुन राईटला' असे तिथल्या लोकांनी दाखवलेले रस्ते ... सुदैवाने अंजनवेल गावात पोहोचल्यावरच पंक्चर झालेली शंकर बापुंची गाडी ... तिथं विचारपुस करुन पंक्चर वाल्याचं शोधलेलं घर.. " मी १० मिनिटात पोहोचेतो जमल्यास तुम्ही टायर खोलुन ठेवा" असं पंक्चरवाला म्हणाल्यावर आबा, बापु , निल्या आणि मी या पार्ट टाईम मेकॅनिक्स नी खोलून ठेवलेला टायर ... पंक्चर काढुन होईस्तोवर किल्लेदर्शन घ्यावं म्हणत ट्रिप्ली मारत गाठलेला दिवसातला सहावा किल्ला "किल्ले गोपाळगड म्हणजेच अंजनवेलचा किल्ला".

## ६. किल्ले गोपाळगड

वशिष्ठी नदी च्या खाडीकिनारी बांधलेला... आदिलशाहीकडून शिवशाहीने जिंकून घेत मराठ्यांच्या नौदलासाठी बांधलेली गोदी...पुढील काळात खैरातखान , तुळाजी आंग्रे...पेशवे सरदार बिलवलकर ... इंग्रज... अशा एका नंतर एक हुकुमतीत राहिलेला... आणि पुढे सरकारी अनागोंदी कारभाराने निव्वळ बेवारस गवताळ कुरण अशी सरकार दरबारी नोंद करुन केवळ ३०० रुपयांत महाराष्ट्र शासनाने विकल्याने आता खाजगीची मालमत्ता झालेला ... इतिहासात स्वराज्याची दौलत इमाने इतबारे सांभाळणारा... आता बॅंकाचे कर्ज असल्याने सातबाऱ्यावर कर्जात असा किल्ला तो हा दुर्दैवी गोपाळगड उर्फ़ अंजनवेलचा किल्ला.

१५ बुरुजांचा, तुळाजींनी बांधलेला बालेकोट आणि खैरातखानने बांधलेला पडकोट  .... छोटेखानी प्रवेशद्वार ...जमिनीकडील बाजूचा खोल खंदक...बुरुजांवर तोफांसाठी बांधलेले जांभ्या दगडाचे भक्कम गोल चौथरे.... पूर्व दरवाजा आहे. परकोटाच्या टोकाला समुद्राकडील बाजूच्या कमानी . तिथला गुप्त दरवाजा आणि त्याच्या समोरील... पाण्याचं टाकं ...पश्चिमेकडे प्रवेशद्वार त्यात शिरल्यावर दोनही बाजूस पहारेकऱ्यांच्या देवड्या... तटावरुन दिसणारा एनरॉन वीज प्रकल्प.... किल्लेदाराच्या वाड्याचे अवशेष, त्याजवळील बांधीव तलाव... काही घरांची जोती असे अवशेष आणि सबंध किल्ल्यात खाजगी मालमत्ता असल्याने आंब्याच्या लागवडी असा सातएकरी ... कर्जबाजारी किल्ला...



शासनदरबारी मुळ आणि खरा गोपाळगड अशी नोंद असलेला नुसताच कातळही पाहुन खाली उतरुन गावात आल्यावर पंक्चर काढुन झालेली शंकर बापूंची घेत.. वाटेल तेवढे पैसे मागता आले असते तरी फ़क्त पंक्चर चे त्या मुलाने मागितले ५० रुपये देत ... त्यातही त्याने हंडाभर सगळ्यांना देउ केलेलं पाणी घेऊन.... एनरॉन वीज प्रकल्प मार्गे १४ किलोमीटरवरचं गुहागर .... गुहागर पासुन.... वेळनेश्वर... नरवन.. मार्गे ३२ किलोमीटर वर अंधारात गाठलेली तवसाल जेट्टी ....

तसं नशीबीच पांडू असावं म्हणून इथलीही ५ मिनिटानेच चुकलेली फ़ेरी... पुन्हा तासभर वाया जाणारा वेळ ... जेट्टीलाच लागून असल्या पुढच्या आणि शेवटच्या असलेल्या दहा वाजताच्या फ़ेरीत गाड्या आणि सोबत अंग टाकणारे काही... आणि वरच्या डेकवर.. मोकळ्या आभाळाकडे पाहत... लाईट हाऊसच्या फ़्लॅशकडे भिरती नजर फ़ेकत... जिंदगी को दुआ देत... सातवा गड जयगड 'नाईट ट्रेक' होणार या खूशीत गप्पा टाकत उभे बापु.. आबा..इशल्या, विलासदा ..जितू.. संक्या आणि मी असे आम्ही....

२५ मिनिटाने पलीकडे पोहोचलेली फेरी बोट... जयगड पोर्ट आणि खाडीवर दिमाखात उभा २ किलोमीटवर असलेला... आणि आजचा ठरलेला मुक्काम चुकल्याने.... आमचं पहिल्या दिवशीचं मुक्कामी ठिकाण होइल असा "किल्ले जयगड" ...

# ७. किल्ले जयगड

तारेच्या जाळीतला....बालेकिल्ला आणि दरवाजाशेजारी खोल खंदक ... दोन बुरुजांमधे लपवलेला दरवाजा...प्रवेशद्वारावर नगारखाना .. बऱ्यापैंकी पडलेले असे त्यात केलेलं नंतरचं वाढीव काम... दरवाजावरील कमळाची फ़ुलं ...पहारेकऱ्यांच्या देवडय़ा आहेत. तटबंदीला असलेल्या पायऱ्या .. छत नसलेला तीन मजली कान्होजी आंग्रे वाडा .. तिथली विहीर... गणपतीचे मंदिर.. त्यालगत दिपमाळ ... बांधणीत तटबंदी कोसळत असल्याने स्वत:हुन नरबळी जात तटबंदीत जिवंत चिणुन घेत बलिदान करणाऱ्या जयबाचं स्मारक ... आणि या कथेमुळेच जयबा च्या नावाने असलेला “किल्ले जयगड” .... भक्कम तटबंदी .. गोल बुरुज.....त्यातल्या माऱ्याच्या जागा ...जांभ्या दगडात कोरलेली गुहा आहे. आत मोहमाया देवीचे मंदिर.... मोबाईल आणि हाततल्या बॅटरीच्या उजेडात तासभर गड पाहुन झाल्यावर “आज मुक्कामी हाच गड करावा” अशी सगळ्यांची इच्छा... आणि सगळ्यांचेच अनुमोदन...

रात्रीचे साडेअकरा होत आल्याने जेवणाच्या सोईच्या काळजीत गडाबाहेर आलेले आबा,विलासदादा, संक्या, मी.... एकदा विचारुन घ्यावं म्हणून तिथं बाहेरच असल्या चौकीत केलेली जेवणाची आणि गडावर राहता येईल का? अशी चौकशी... इथं फ़ार किस्से होतात... इथं मुक्काम करणं चांगलं नाही.. ही पोलिस चौकी आहे... तरी आम्ही बाहेर काय अंगणातही एकटं जात नाही... भुताटकी आहे ... इथं थांबू नका , चांगलं नाही.. अशी मिळालेली उत्तरं ... झोपायला काय नाय पण परत रात्री येऊन त्रास दिला तर म्हणत सगळ्यांच्या संमतीने रद्द केला जयगड मुक्कामाचा प्लान ... आणि आधी जेवायचं बघू मग झोपायचं म्हणत किलोमीटरवरच्या अंतरावर असलेल्या हॉटेलात कोंबडी आणि मासे थाळीवर मारलेला ताव.. काऊंटर वर राहायच्या सोयीची निष्फ़ळ ठरलेली विचारपूस ... दोन घास गेल्याने थोडा फ़ार आलेला चेव घेऊन मुक्कामाला गणपतीपुळे गाठायचा एककलमी कार्यक्रम...

हेडलाईटच्या उजेडात मऊ वाऱ्यागतच असलेल्या डांबरी रस्त्यावरून जाताना गणपतीपुळे किती लांब ? विचारायला साडेबाराला लागलेलं “रीळ” गाव... गावात शिमग्याच्या उत्सवाची चाललेली तयारी... पुढे कशाला जाता झोपा हिथंच या दाखवतो जागा म्हणत त्या काकांनी अंधारात दाखवलेली हवेशीर कौलारु छताची प्रशस्त जागा... बॅगा उतरवुन आपापली अंथरुण एकत्र करुन सगळ्यांसाठी जागा करणारे सगळे दोस्त... संक्या इशल्या सुरज निल्याच्या अंगात इतकं दमूनही चाललेली वळवळ... एकेमेकांवर कोट्या... थोडीफ़ार गंमत... अंधारातलं चांदण्यांचं हसू... रेलीस्प्रे चा घमघमाट.. उत्सवाचे ढोल वाजत असला तरी क्षणात आमच्या देहाने केलेला झोपेचा सोहळा....



**निलेश सकुंडे** ,नेरुळ
फ़ोटोग्राफ़र



**नीरज पवार**
बोरीवली



**सुशांत मोहीते**
बोरीवली



**आकाश पाटील** ,
नालासोपरा



**किरण माळी**
,बदलापूर

पहिल्या संपुर्ण दिवसाच्या Route Map साठी इथे क्लिक करा.

# दिवस दुसरा

सकाळी गाव उठायच्या आतच उठून शेजारच्या विहिरीवर हात पाय तोंड धुवून.. अंघोळीसाठी पुढे एक एक करत निघून भर सकाळ.. उगवत्या सुर्यासोबत कोस्टल राईड करत रीळ , मालगुंडचे… घाटदार रस्ते ओलांडत… २० किलोमीटरवर गाठलेलं गणपतीपुळे…तिथल्या व्यवस्थेतल्या सोयीत उरकल्या सगळ्यांच्या आंघोळी …. मग एकत्र गपणती दर्शन… सभागारात थोडंफ़ार देवाचं चिंतन… आज आधी विठोबा आणि त्यानंतर केलेला पोहे.. मिसळ.. चहा असा पुळ्यातच केलेला पोटोबा… आणि आजच्या दुसऱ्या दिवसातला पहिला आणि मोहिमेतला आठवा किल्ला रत्नागीरीतल्या "किल्ले रत्नदुर्गसाठी प्रस्थान….

गणपती पुळे सोडल्यावर .. काजीरभाटी.. आरेवारे मार्गाने मोहिमेचे ठरले नियम एकसंग पाळत…. २५ किलोमीटर वर असलेल्या रत्नदुर्गच्या पायथ्याला लागलेल्या गाड्या…

## ८. रत्नदूर्ग (भगवतीचा किल्ला)

बहामनी बांधणीचा…आदिलशाही आणि नंतर शिवशाहीतला… घोड्याच्या नालेच्या आकाराचा १२० एकरी गिरिदुर्ग किल्ले रत्नदुर्ग.. श्रीभगवतीचे शिवकालीन मंदिर, इथली ओळख असलेला तीन तोंडाचा भुयारी मार्ग.. लाईट हाऊस…. रेडेबुरुज आणि त्यावर उभा स्तंभ… तटावरुन उभं राहुन दिसणारा विहंगम सागरी सौंदर्य… परीसर…किल्ल्यावर असलेलं तळं आणि खोल विहिर.. अशी अर्धा तासातली भटकंती झाल्यावर पायथ्याच्या दुकानातुन रिफ़िल केल्या… नव्या घेतल्या पाण्याच्या बाटल्या बॅगेला बांधुन… रत्नागीरी … भाट्ये … पावस मार्गे "पुर्णगड" किल्ला … असा २८ किलोमीटर पल्ला….










## ९. किल्ले पूर्णगड

गावातुन किल्ल्याकडे जाणाऱ्या दोन वाटांनी आलेले आणि वेगवेगळे पोहोचलेले सगळे... किल्ल्याच्या दारावरचे मारुतीचे देऊळ.. शिवकालीन बांधकामाची छाप असलेला... लपवलेला दरवाजा... दरवाजावर गणेश तसेच चंद्र- सूर्याची शिल्पे... दरवाजाच्या आत पहारेकऱ्यांच्या देवड्या... दगडात कोरलेली कमळांची फुलं ... तटबंदीकडे जाणारा पायरी मार्ग.... . पश्चिम दिशेला ढासळलेली तटबंदी आहे... पश्चिमेचा अफ़ाट निळ्या सागराचे दर्शन देणारा दिंडी दरवाजा ....गडकऱ्यांच्या वास्तूचे अवशेष ... तटबंदीवरुन गडाला संपुर्ण फ़ेरी... इतरही ट्रेकर्सची आपुलकीने चौकशी पाण्याची देवाणघेवाण ...थोड्याफ़ार गप्पा....





पूर्णगड पूर्ण बघून... पूर्णगड - आडिवरे - पानेरे मार्गे ३२ किलोमीटरवर गाठलेलं नाटे गाव... आणि यशवंतगडा आधी पाहायचा ठरलेल्या ५ किलोमीटर वर असलेल्या आंबोळगडाकडे रवाना गाड्या ....

## १०. किल्ले आंबोळगड

अर्जुना नदी आणि खाडीतीरी वसलेला आंबोळगड... . समुद्राच्या बाजूची जराफ़ार तटबंदी....एक विहिर .... वाड्यांच्या जोती आणि एक तोफ़ याशिवाय किल्ल्यावर राहिलेला फ़क्त पाचोळा ... तो तुडवत माघारी फ़िरत तिथून एकाच किलोमीटर वर असलेल्या गगनगीरी महाराजांच्या मठात दुपारी घेतलेली विश्रांती आणि सोबतीला बांधुन आणलेल्या सॅंडवीच च्या सामानाची खोलाखोल आणि कापाकापी... प्रत्येकी दोन दोन सॅंडविचे संपवल्यावर.. माठातलं गार पाणी पोटात गेल्यावर त्या मठातल्या ओसरीवर टेकलेली पाठ आणि आजच्या उरलेल्या किल्ल्यांच्या इतिहासाची दिली घेतली माहिती ... १० मिनिटाच्या पावरनॅप नंतर ... यशवंत गडासाठी उतरलेलं आबोंळगड गाव



# ११. किल्ले यशवंतगड



विजापूरकरांनी बांधलेला.. दरवाजालगतची पायरी बैठक, पूर्वेचा गुप्त दरवाचा, खंदकात खोदलेली पावट्या विहीर, भक्कम बांधणीचे बुरुज.. पहारेक-यांच्या देवड्या असे अवशेष असलेला आणि २०१२ सालच्या माहीती अधिकारात उघड झाल्या माहितीनुसार ३५ लाखात स्वराज्यातला गोपाळगडानंतर विकलेला हा दुसरा किल्ला "किल्ले यशवंतगड".

दिवसातला तिसरा आणि मोहिमेतला अकरावा गड यशवंत गड करुन स्वराज्याच्या आरमाराचा मानबिंदू "किल्ले घेरिया म्हणजेच विजयदुर्ग साठी पुन्हा नाटे- जैतापूर – सागवे – तिरलोट -गिर्ये मार्गे दिड तासात विजयदुर्ग असा ५० किलोमीटर पुढचा टप्पा...

# १२. किल्ले विजयदूर्ग (घेरीया)

वाघोटन नदी व सागर संगमावर उभा.. शिलाहार राजा भोज यादव यांनी १२ व्या शतकात बांधलेला , विजयनगर, बहामनी, आदिलशाही या राजवटींनंतर शिवशाहीचा मान मिळवत साडे अडरा एकरात विस्तारलेला.... मराठ्यांच्या आरमाराचे प्रमुख केंद्र होत... मुघल...इंग्रजांना घेरी आणणारा 'घेरिया'.... त्यानंतर कोकण पट्ट्यातील इतर किल्ल्यांप्रमाणेच आंग्रे... इंग्रज आणि पेशवे अशा हुकुमतीत राहिलेला....१८७८ मधे जगात पहिल्यांदा "हेलियम वायूचा" शोध ज्या ठिकाणी लागला तोच हा "किल्ले घेरिया म्हणजेच विजयदुर्ग"

या इतिहासाला मुख्य "हनुमंत दरवाजा" ...त्यासमोर महाराजांनी स्थापन केलेल्या मारुतीचे मंदीर... रचुन ठेवलेले तोफ़गोळे ...तोफ़...जिबीचा दरवाजाला पडकोटाच्या तीन तटबंद्या..तीन दरवाजे... आणि तिहेरी तटबंदी... खलबतखान्याची इमारत.. भव्य सदर... घोड्याच्या पागा, सदरेसमोरचा चुन्याचा घाणा... बुरुजावर बांधलेल्या दोन मजली इमारती .... भव्य बुरुजावर... राणीवसा इमारत... खुबलढा उर्फ बारातोपा बुरुज....गणेश, राम, हणमंत, दर्या

बुरुज...  तुटका, शिकरा, सिंदे, शहा, व्यंकट, सर्जा, शिवाजी, गगन, मनरंजन, घनची व पान असे बुरुज व तटबंदीतील जंग्या, तोफ़ांसाठी झरोके .... किल्ल्यावरून थेट खाडीखालून गावातील आनंदराव धुळपांच्या वाड्यात उघडणारं प्रचंड भुयार...भवानी मंदिर ... हेलियमचा शोध जिथे लागला ते  "साहेबांचे ओटे"... पायरी हौद ... शिलाहारी धान्य कोठार... जखिणीचे मंदिर....जखिणीची तोफ़ असा भक्कम , आणि देखणा भूगोल... मग एकत्रित गारद ..

दिड तासाच्या चालत्या बोलत्या इतिहासासोबत विजयदुर्ग भेट झाल्यावर... थंडगार पाण्याचे दोन घोट घेऊन.... ३२ किलोमीटरचा विजयदुर्ग-गिर्ये-पुरळ-वाडातर-जामसंडे मार्गे देवगड या मोहिमेच्या पुढच्या किल्लाकडे कूच...











# १३. देवगड किल्ला

टेकडीवरील बालेकिल्ला.. गणपतीचे मंदिर... ... पूर्व पश्चिम पसरलेली तटबंदी... त्यातील ३ बुरुज...खोल खंदक....तटबंदीच्या पूर्व टोकाला २ बुरुजांच्या मध्ये लपवलेला गोमुखी दरवाजा . दरवाजाच्या आतील बाजूस तटबंदीतच हनुमानाची मूर्ती...बुरुजावर जाणारा जीना...चिरेबंदी वास्तू...कातळात खोदलेली टाकी...बुरुजातल्या जंग्या...तोफासाठी झरोके ..चौथऱ्यांचे अवशेष किल्ल्यावरची पोर्ट ट्रस्टची कार्यालये .. लाईहाऊस... दर्याकडली तटबंदी... ओसरता दिवस...उतरणीचा सूर्य... लाटांची गाज ... वाऱ्याचा आवाज... संथ..शांत.. एक निवांत क्षण...





संध्याकाळसकट आज लवकर संपला दिवस.. प्रवास ... मुकामाला देवगड ते खाक्षी ते तीठा ते एलये ते कुणकेश्वर असा १९ किलोमीटर प्रवास... मंदिराशेजाराच्या हॉटेलमध्ये सगळ्यांची व्यवस्था... स्नानसंध्या... मोबाईल चार्जिंग साठी वेळापत्रक .. थकव्याने मिटले डोळे... जेवणाच्या हाका... कोकणी मासे थाळीवर ताव.. एक अधिक एक सोलकढी ग्लास... सकाळी बॉडी स्प्रे.. रात्री रेली स्प्रे या सूत्रासह मिटल्या डोळ्यावर आलेली आठवणींची प्रेमय.. मित्रांच्या खांद्याची उशी... झोपेची कुशी.. मुद्दलीतला दुसरा दिवस संपल्याचं निर्व्याज समाधान...



**प्रथमेश जाधव** , शिवडी



**जयेश वैती** , मुलुंड



**प्रणिल गायकवाड** , अंधेरी

दुस-या संपुर्ण दिवसाच्या Route Map साठी इथे क्लिक करा

# दिवस तिसरा

देवळातल्या घंटानादाने आलेली जाग.. अंघोळ उरकतानाचे आरतीचे सूर... त्यानंतर थेट गाठलेला कुणकेश्वराचा गाभारा... मनोभावे दर्शन... षटकोनी प्रदक्षिणा.... आणि कुणकेश्वर - मिठबाव - आचरा - वायांगणी मार्गे तिसऱ्या दिवसातल्या पहिल्या आणि मोहिमेतल्या चौदाव्या भगवंतगडाकडे ३१ किलोमीटरी चाल...



## १४. किल्ले भगवंतगड

सावंतवाडीकर आणि कोल्हापूर गादीतल्या लढायांचा साक्षीदार... एका वर्गात ५ या सरासरीची पायथ्याची शाळा.. तिथून पुढे गडाकडे जाणारी १० मिनिटाची पायवाट... ढासळलेले तट बुरुज... सिध्देश्वराचे मंदिर...चिरेबंदी तुळशीवृंदावन... चहुबाजुंची जोती.... समोर दिसणारी कालावल खाडी... गर्द झाडांवरून किल्ल्यावर मुक्त वावर असलेली वानरं... दिड एकरी किल्ला... गड उतरताना पतंगा उर्फ बाणपाखरु उर्फ स्वर्गीय नर्तक उर्फ सुरंगी उर्फ नंदन इतकी नाव असल्या paradise flycatcher पाखराने दिलेलं दर्शन.. वाटेत अडवणारा काळाशार विंचु...








शाळेच्या ओसरीवर ठेवेलेल्या बॅग उचलून पायऱ्या उतरलेला भगवंतगड.. इश्ल्याने गाडीवर वाळत घालत तसेच ठेवलेलं शर्ट आणि हेल्मेट.. ते कुणी चोरू नये म्हणुन आम्ही गडाखाली येईपर्यंत वाट पाहणारे म्हातार बाबा... थोडी कानउघडणी.. भरतगडाकडे निघण्याआधी फेसबुक वरचे फोटो पाहिल्यावर  हिमाचल प्रदेशातून स्वामीजींचा आलेला मोहिमेची चौकशी करणारा आणि महत्वाची ठिकाणं सांगणारा फोन.... भरत गड ते भगवंत गड असा चिंचोळ्या गाव, वाड्या वाटेने झाडा झुडपातुन मसुरे गावापर्यंतचा ४  किलोमीटर प्रवास... भरतगडाच्या पायथ्याला भेटलेला सावंतवाडीवरून आलेली १० वी गाडी आणि १८ वा गडी संतोष ठाकूर ... गावातल्या म्हाताऱ्या माऊलीने गडावर पाण्याची सोय नाही म्हणुन सोबत दिलेली पाण्याची कळशी खांद्यावर घेत चढलेला किल्ले भरतगड

## १५. भरतगड (मसुरेचा किल्ला)

सावंतवाडीकरांनी बांधलेला भरतगड.. गडाच्या दोन्ही बाजुचे बुरुजाला लागुनच पहिला असे दोन दोन दरवाजे ..दरवाजाच्या आत पहारेकऱ्यांची देवडी..डावीकडील तटबंदीजवळचं मंदिर चौथऱ्यावर देवसिद्ध महापुरुषाचं मंदिर...त्यासमोरचं तुळशी वृंदावन.. २०० फूट खोल विहीर...विहिरीच्या तळाशी एक गुप्त दरवाजा.. दरवाजातून थेट सिंधुदुर्ग किल्ल्यात जाता येते अशी आख्यायिका... मंदिराशेजारची मशीद ...डावीकडील तटबंदीमधे एक लहान दरवाजा  उत्तम बांधणीचा भक्कम बुरुज ... तोफ़ांच्या जागा...  मधल्या मोकळ्या पाय-यांवर बसुन संतोष ने पहाटे ३ ला उठुन स्वत;च्या हाताने बनवलेली भाजी .. त्याच्या वहीनीने बांधुन दिल्या नाचणीच्या गरम मऊ भाकरी... नशीबवंताला लाभावी अशी हातात घेऊन संपवलेली न्याहारी .कळशीतलं पाणी.. त्रिवार धन्यता... मोकळ्या कळशीसह उतरलेला गड...









**संतोष ठाकूर**
सावंतवाडी

दिवसातल्या तिसरा आणि मोहीमेतला सोळावा किल्ला "सर्जेकोट" साठी... मसुरे - नहीवे - कोलंब - करत २२ किलोमीटर गाठला...सर्जेकोट

## १६. सर्जेकोट

सिंधुदुर्गाच्या रक्षणार्थ शिवरायांनी बांधलेला सर्जेकोट... कमानदार छोटा प्रवेशदरवाजा... त्यालगतचा बुरुज... बालेकिल्ला व त्याचे चार बुरुज आणि शाबुत तटबंदी ... बालेकिल्ल्यातली विहिर... तुळशी वृंदावन... तटाकडे निघणारे जीने... मधे घातलेला बांध... पलीकडे नारळाच्या झाडाला सध्या असलेली सिंचन व्यवस्था.... २० मिनिटात आटपलेली गडफ़ेरी आणि ३ किलोमीटवर उभ्या राजकोटाकडे चाल....



## १७. राजकोट

शिवशाहीची उभारणी ... ढासलेली तटबंदी आणि लहानसे देऊळ सोडल्यास ... फ़क्त सुकी मासळी वाळवण्यासाठी होणारा किल्याच्या उरल्या भागाचा उपयोग... तटावरुन दिसणारा अजस्त्र , राकट सिंधुदुर्ग ... आणि दर्याचं सुंदर रुप...



राजकोटवरुन समोरच दिसणाऱ्या दिड किलोमीटर वरच्या मालवण जेट्टीवर पार्क केलेल्या गाड्या... सुटीचा दिवस तरी तुरळक असलेली गर्दी ... बोटीसाठी बुकिंग लाईन ... दहाव्या मिनिटाला आम्हाला व्हाया पद्मदुर्ग.. सिंधुदुर्गाकडे घेऊन जायला आलेली बोट ... उभे राहु नका... हात आत घ्या आधीस सांगतो तासाच्या पुढे एक मिनिट जरी झाला तर फ़ाईन घेऊ असे नावाडीबाबाच्या किरकिरी धमक्या.... तरी विनवणी करून.. आणि जास्तीज़चे पैसे मोजून आधी गाठलेला पद्मदुर्ग

# १८. किल्ले पद्मदूर्ग

सिंधुदुर्गाच्या रक्षणार्थ शिवरायांनी बांधलेल्या त्रयीतला सर्जेकोट.. राजकोट शिवायचा तिसरा गड पद्मदुर्ग... दांडगेश्वराचे मंदिर.. रचीव दगडांची तटबंदी... लहानसा दरवाजा.. तिथून आत वेताळाचं मंदिर... तिथून खुणावणारी सिंधुदुर्गाची तटबंदी ....

त्यानंतर पुन्हा बोटीने गाठलेला सिंधुदुर्गाचा दरवाजा...

# १९. किल्ले सिंधूदूर्ग

“चौऱ्याऐंशी बंदरात हा जंजिरा, अठरा टोपीकरांचे उरावर शिवलंका अजिंक्य जागा निर्माण केला. सिंधुदुर्ग जंजिरा, जगी अस्मानी तारा जैसे मंदिराचे मंडन, श्रीतुलसी वृंदावन राज्यास भूषणप्रद अलंकार चतुर्दश महारत्नांपैकीच पंधरावे रत्न महाराजांस प्राप्त झाले“ हा चित्रगुप्ताच्या बखरीतील वर्णन अजुनही सार्थ करत " या जागी बुलंद किल्ला बांधून वसवावा चौऱ्यांशी बंदरी ऐशी जागा नाही" या शिवाआज्ञेत साकारलेली शिवलंका... इंग्रज, पोर्तुगीज, चाच्यांनी ज्याची धास्ती घेतलेला असा अभेद्य उभा दर्याभुषण "किल्ले सिंधुदुर्ग"

२५ नोव्हेंबर १६६४ रोजी मालवण किनाऱ्यावरील मोरयाचा धोंडा ह्या गणेश, चंद्रसूर्य, शिवलिंग कोरलेल्या खडकांची पूजा करुन व समुद्राला सुवर्ण श्रीफळ अर्पण करुन महाराजांनी सिंधुदुर्ग किल्ल्याच्या मुहुर्ताचा बसवलेला चिरा... शिवरायांच्या देखरेखीखाली किल्ला बांधणीत लागलेले ५०० पाथरवट, २०० लोहार, १०० गोवेकर पोर्तुगिज व ३००० मजूर त्यांची ३ वर्षे अहोरात्र मेहनत... सागरी लाटांपासून होणारे नुकसान टाळण्यासाठी व किल्ल्याचा पाया भक्कम

करण्यासाठी उकळते शिसे ओतून त्यावर बसवण्यात आलेले मोठे चिरे.. घाटावरुन मागवलेला चुना वापरुन किल्ल्याचे इतर बांधकाम...२९ मार्च १६६७ रोजी महाराज्यांच्या साक्षीने पूर्ण झालेले सिंधुदुर्ग किल्ल्याचे बांधकाम

४२ बुरुज असलेल्या किल्ल्याचा "गोमुखी" महादरवाजा ...दरवाजाच्या बाजूला घडीव दगडाचे..चिरेबंदी बुरुज ...बुरुजात जागोजागी जंग्यांची रचना...महाद्वाराच्या दगडात कोरलेले स्वराज्यातील प्रत्येक किल्ल्यावरचे बलस्थान मारुती मंदिर .... महाद्वारावरील नगारखाना ...आत आल्यावर डाव्या बाजूच्या पायऱ्यावर दोन छोट्या घुमट्या.... खालच्या घुमटीत बांधणीची देखरेख करताना चुन्यात उमटलेला महाराज्यांच्या डाव्या पायाचा ठसा तर वरच्या घुमटीत उजव्या हाताचा ठसा...







जरीमरीचे मंदिर..

पुढे महाराष्ट्रात एकमेव असलेले राजाराम महाराजांनी स्थापलेले "श्रीशिवराजेश्वराचे मंदिर".... गाभाऱ्यातली शहाजी महाराजांनी तोरणा जिंकल्यावर महाराजांना भेट केली ऐतिहासिक तलवार.....शिवराजेश्वर मंदिराच्या मागे श्री महादेव मंदिर... मंदिरातच असलेली विहीर आहे. तिथून पुढे गेल्यावर साखरबाव, दुधबाव व दहीबाव या गोड्या पाण्याच्या विहीरी.... शिवरायांच्या वाड्याचे जोते आहे....दर्याबुरुज ...चंद्रकोरी पुळण असलेली "राणीची वेळा" ...भगवती देवीचे मंदिर... महापुरुष मंदिर.. असा भरभक्कम भूगोल...



५५ मिनिटात ही सफर आटपून शोधलेली आमची बोट आणि किरकिरा नावाडी.... एकटेच मागे राहीलेले शंकर बापू... ५ मिनिट थांबा की काका अशी विनवणी करून सुध्दा नावाड्याने सोडलेली बोट ... पोरांनी बापुंच्या नावाने फोडलेला लाडका टाहो... धावत येत थेट बोटीत उडी टाकल्यावर पोरांनी केलेला एकच गलका ... हे प्रेम पाहून शेजारच्या बोटीमध्ये पिकलेला हशा.. आणि जरा ओठांवर उमलेलं तिरकी नजर नाजूक "देखणं" हसू..

लागलीच गाड्या काढुन दक्षिणेकडे मालवण सागरी महामार्गाने चिपी ते परुळे मार्गे २७ किलोमीटर वर गाठलेला दिवसातला ७ वा आणि मोहिमेतला २० वा   शिवरायांनी बांधलेला गिरीदुर्ग निवती किल्ला

# २०. निवतीचा किल्ला

सिंधुदुर्गनंतर स्वराज्याच्या बांधणीचा...पुढे सावंतवाडीकर सावंत ....पोर्तुगीज ... करवीरकर.. पुन्हा सावंत आणि इंग्रज अशा हुकुमतीचा इतिहास असलेला चिरेबंदी पायऱ्यांचा...खोल खंदकानी...भग्न तटबंदीचा निवतीचा किल्ला...प्रवेशद्वाराच्या आतील बाजूस देवड्या ...जंग्यासह भव्य बुरुज ... त्यावरील बालेकिल्ल्याची प्रवेशद्वारं, देवड्या, शाबूत तटबंदी...जुन्या वास्तूंचे चौथरे... असा विलोभनीय भूगोल...



किल्ला पाहायला मुंबईहून भटके आले आहेत हे कळाल्यावर गड पायथ्याला भेटायला आलेले तिथले MTDC चे कर्मचारी... त्यांनी पुढचा प्रवास सोप्पा व्हावा म्हणुन दिलेला सिंधुदुर्ग जिल्ह्याचा नकाशा... कळशीभर पाणी... तो घेत पुन्हा तांबड्या वाटांनी गाठलेला हायवे...निवती ते परुळे ते पाट ते म्हापण अशा प्रवासात हायवेला लागलेले "ड्रायव्हर थकला आहे  थोडं थांबता का ?" इशाऱ्याचे फलक... अखेर शेवटी ३६ किलोमीटर प्रवास करत जेवणाच्या थांब्याला गाठलेलं वेंगुर्ले...

लगेच मिळेल म्हणुन सगळ्यांनीच Order  केलेलं .. झट्क्यात संपलेलं चायनीज....  तुफानी करतोच आहे म्हणून घेतलेलं थम्स अप ... ते संपवून उतरत्या रस्त्याने गाठलेला वेंगुर्लेचा भुईकोट (डच वखार)

# २१. वेगुर्ले भुईकोट (डच वखार)



भग्न वास्तू असल्याने कुणीही आंत जाऊ नये असा इशारा फलक... वखारीच्या प्रवेशदवाराची अर्धवर्तूळकार कमान... पोर्तुगिज धाटणीचे चौकोनी बुरुज.. बुरुजांमधली जंग्यांची रचना... देवड्या ... दुमजली इमारत.. इमारतीच्या मागच्या बाजूस चौकोनी विहिर... वरच्या मजल्यावर जाण्यासाठी सुंदर कोरवी जीने... कधीही कोसळतील असे भग्न अवशेष...

भुईकोट दर्शन संपवल्यावर नकाशावर घेतलेली मोहिमेच्या पुढच्या टप्प्यांची उजळणी... ती संपवून वेंगुर्ले - मोचेमाड - अरवली - शिरोडा मार्गे २४ किलोमीटर वर गाठलेला रेडीचा यशवंगड किल्ला...

# २२. रेडीचा किल्ले यशवंतगड

विजापूरकर... आदिलशहा , सावंतवाडीकर, शिवशाही ते पोर्तुगीज इतिहास असलेला यशवंतगड, अजूनही जिवंत अवशेष... एकानंतर एक अशा चार दरवाजाचा ... बुरुज... तटबंदी..पहारेकऱ्यांसाठी देवड्या... बालेकिल्ला...राजवाडा... दरबाराची दुमजली इमारत...पहिल्या व दुसऱ्या मजल्याचे दरवाजे, खिडक्या, कोनाडे, झरोके भिंतीना वेढलेल्या आणि वाढलेल्या झांडांच्या मुळांनी झालेले भयावह आकार... भिंतीवर खडूने काढलेली ख्रिचन धार्मिक देवदेवतांची चित्र.. गोव्यात असल्याने गड पहायाला विदेशी पर्यटकांची ये - जा...









किल्ले दर्शन आटपून वेलकम टू गोवा सिंगम म्हणत ७ किलोमीटर वर संध्याकाळी गिरीदुर्ग तेरेखोलचा किल्ला गाठण्याआधी.. चौथे देवस्थान नवसाला पावणारा अशी ख्याती असलेल्या "रेडीच्या गणपती" चे दर्शन...... तिथे प्रसाद घेऊन बाप्पा मोरया गजरासह तेरेखोल कडे प्रवास .



## २३. तेरेखोल किल्ला

सावंतवाडीकर सावंतांनी बांधलेला त्यांनतर पोर्तुगीज...मराठे.. इंग्रज असा इतिहास असलेला...आता गोवा सरकारच्या ताब्यात आल्यावर मुळ रचनेत बदल करून फ़ाईव्ह स्टार हॉटेल झालेला किल्ला तेरेखोल ..पोर्तुगिज कालीन चर्च ....पोर्तुगिज बांधणिचा कॅप्सुल बुरुज.....आणि तटबंदी. सहानंतर पर्यटकांना प्रवेश नाही म्हणुन बंद झालेले दरवाजे...



तिथून माघारी शिरोडा..अजगाव...मालगाव... करत ३४ किलोमीटवर सावंतवाडीत आधी घेतलेला चहा आणि सावंतवाडी राजवाडा दर्शन.

## २४. सावंतवाडी राजवाडा



स्वातंत्रपूर्वकाळातील "सावंतवाडी संस्थानच्या" राजधानीच्या शहरातील राजवाडा.. त्यातली सावंतवाडी संस्थानाच्या इतिहासाची माहितीसह सर्व राजांचे फोटो... आणि गंजिफ़ांच्या हस्तकलेची कारागिरी पाहून पुन्हा घेतलेला चहा ..

पुढचा प्रवास आणि आज ठरलेला पारगड किल्ल्याच्या मुक्कामाची फेरपडताळणी...सावंतवाडी - सातुली - मग आंबोली घाट चढल्यावर नार्वेकर खाणावळीत घेतलेला रात्रीच्या जेवणासाठी hault .. पोटभर जेवणानंतर नेने - चौकुल - इसापुर - पारगड असा रात्रीच्या अंधारात जंगलाच्या मार्गाने... मध्ये रस्त्याचे काम सुरूर असल्याने ५ इंची धुळीत आणि आता झाला खरा धुरळा रात्रीच्या अंधारात गाडी चालवण्याच्या अवघड परीक्षेत ४६ किलोमीटरचा उधळलेला रस्ता....आणि मध्यरात्री गाठलेला मुक्कामी पारगड...

पारगड गाठल्यावर शेवटच्या मुक्कामी झोपेसाठी भवानी मंदिराच्या प्रशस्त सभागारात अंथरलेली सतरंजी... त्यावर अंथरले देह...

तिस-या संपुर्ण दिवसाच्या Route Map साठी इथे क्लिक करा

# दिवस चौथा

सकाळच्या उजेडात रात्रीच्या धुरळ्याचा अंदाज देणारे माखलेले सगळ्यांचे चेहरे, कपडे... विहीवर जाऊन केलेली अंघोळ आणि भवानी, मारुती , गणेश आणि वर आभाळी सरकत्या सूर्यदेवच्या दर्शनाने सुरु केली गडफेरी...

## २५. किल्ले पारगड

गोव्याच्या पोर्तुगीजांवर वचक ठेवण्यासाठी गड बांधून दिल्यावर ‘चंद्र सुर्य असेतो, गड जागता ठेवा’ अशा किल्लेदार रायबा मालुसरे आणि ५०० मावाळ्यांना तेव्हा झालेल्या शिवाज्ञेचे पालन करत अजुनही सेवेत असलेल्या गडकऱ्याच्या वस्तीचा.. महाराज्यांचा पदस्पर्श लाभलेला.. स्वराज्यातील पार टोकाचा म्हणून नाव ठेवला गड "पारगड" शिवकालीन पायऱ्याचा राजमार्ग...तोफांचे अवशेष ... आणि भगव्याचा डौल ...डाव्या हाताचे मारुती मंदिर...मंदिरा समोरच घडीव दगडातील समाधी...शिवरायांची मुर्ती... जिर्णोध्दारीत भव्य भवानी मंदिर... प्राचीन गणेश मंदिर आहे. गुणजल, महादेव, फाटक व गणेश तलाव ... शिवकालीन ४ विहिरी भालेकर, फडणीस व महादेव , माळवे, भांडे, झेंडे बुरुज...



असा भरभक्कम भूगोल पाहून तिथच असलेल्या एका घरवजा छोटेखानी हॉटेल मध्ये खमंग पोहे आणि मसाला चहा अशी न्याहारी... मोहिमेत आतापर्यंत झालेला आणि पुढे होणाऱ्या खर्चाची आबाने सर्वांना दिलेली हिशोबी माहिती.... त्यानंतर शेवटच्या दिवसाचा मुक्काम नसलेला पहिला हेरे - चंदगड - अमरोली - अडकुर - कानडेवाडी - करत ५८ किलोमीटरवरचं वीर स्मारक नेसरी असा टप्पा...

# नेसरी स्मारक

"वेडात मराठे वीर दौडले सात" कुसुमाग्रजांच्या लेखणीतून उतरल्या अजरामर गीतात वर्णलेले शूर सेनानी सरसेनापती प्रतापराव गुजर, विसाजी बल्लाळ, दिपोजी राउतराव विठ्ठल, पिळाजी अत्रे, कृष्णाजी भास्कर, सिद्दी हलाल आणि विठोजी हे सहा सरदार ....

इतिहासाच्या पाऊलखुणा -



विजापूरहून आलेल्या बहलोलखान याने बारा हजार स्वारांनिशी स्वराज्यावर चाल करून मोठा धुमाकूळ घालत रयतेवर केलेले अत्याचार.. प्रतापरावांनी त्याचा पराभव करून.. बहलोल खान शरण आल्यावर त्याला दिलेली माफी...रयतेचे हाल करणाऱ्या बहलोलखानास सोडल्यामुळे महाराजांनी प्रतापरावांस पाठवलेला "बहलोलखानास गर्दीस मिळविल्याशिवाय आम्हास रायगडावर तोंड दाखवू नका" असा हुकुमी खलिता ....महाराजांचा खलिता मिळताच बहलोलखानाच्या मागावर निघाल्या प्रतापरावांना त्यांच्या छावणीच्या जवळच असलेल्या नेसरीत हेरांकरवी कळालेला बहलोलखानाचा तळ... त्यानंतर तडक बहलोल खानावर चाल करण्यास घोड्यावर एकटेच निघालेल्या सरसेनापतींच्या मागोमाग निघालेले विसाजी बल्लाळ, दिपोजी राउतराव विठ्ठल, पिळाजी अत्रे, कृष्णाजी भास्कर, सिद्दी हलाल व विठोजी हे सहा वीर. या सात वीरांनी बारा हजार सैन्यामध्ये घुसून शेकडो गनिमांना ठार मारत... दाखवलेल्या पराकोटीच्या स्वामीनिष्ठेला आणि त्यांच्या स्वराज्यावरील प्रेमाला मानाचा मुजरा करत उभं "नेसरी स्मारक"

या वादळी इतिहासापुढे नतमस्तक होत... मोहिमेचा शेवटचा किल्ला "किल्ले सामानगड"साठी २८ किलोमीटरी बटकणगळे - महागाव - हरळी - वैरागवाडी - हसुरवाडी -हसुरसासगिरी - नौकुड - चिंचेवाडी मार्गे सामानगड असा दिवसातला दुसरा टप्पा...





**जितेंद्र ताम्हणे**, अंधेरी
मोहीमेचा GPS



**सुरज सकपाळ**, पनवेल
मोहीमेचा वाटाड्या

# २५. सामानगड



शिलाहार बांधणीचा.. शिवशाही, करवीरवर, नंतर इंग्रज हुकुमतीत राहिलेला स्वराज्यात रसद पुरवणारा म्हणून नाव पडलेला "सामानगड"... निशाण बुरुज..चिलखती सोंडया बुरुज.... मुगल टेकटी...चौकोनी विहिर...अंबाबाईचे कौलारु मंदिर.. शेजारचे चौथरे... कमानी पाय-यांची कमान बाव ....

मोहिमेतला शेवटचा सामानगड सफर संपवून मुंबईसाठीच्या ५५० किलोमीटरच्या एकगठ्ठा परतीच्या प्रवासाच्या प्रश्नाला उत्तर झाला.. उत्तर दिशेला ३० किलोमीटर वर असलेला गडहिंग्लज मग महाराष्ट्र आणि कर्नाटक या दोन राज्यातून जाणाऱ्या काळभैरी रस्त्यामार्गे निपाणी नंतर राशिंग - शिप्पूर - तवंदी घाटमार्ग पार करत...लागलेला राष्ट्रीय महामार्ग क्र. ४ ... तिथून तासाभरात गाठलेलं कोल्हापूर... कोल्हापुरात येऊन



तांबडा पांढरा चुकवणे म्हणजे अस्सल चवीचे पाप... ते घडायला नको म्हणुन तासाभराची ४ वाजेपर्यंत कोल्हापुरी मेजवानी... करवीरकर अमर मोरेंची सदिच्छा भेट वाट्यावर वाट्यांचे फुरके ... वषाट आहाराने आलेली पेंग... तिथल्या पंपावर मुंबईपर्यंतच्या लांबलचक पल्ल्यासाठी भरलं टाकी फुल्ल पेट्रोल... तासाभरात पेठ ओलांडत गाठलेलं कराड... तिथल्या नाक्यावरचं वैतागवाडी ट्राफिक... कराड सोडल्या वर साताऱ्याच्या आधी पडलेला गारांचा पाऊस... जरावेळ आडोसा त्याने झालेली सगळ्यांची चुकामुक... मग थेट साताऱ्यातच भेटीचा ठराव... शहर नाक्यावर लागणाऱ्या ट्राफिकने साताऱ्यापर्यंत वाजवलेले ६ ... पोरांच्या अरायव्हल ची वाट पाहत सातारा हायवेला उभे लेक झाल्याचा बातमीसकट बर्फ़ी द्यायला आलेले संदीप देशमुख आणि सोबत अजयदादा जाधवराव... मग कंदी पेढे.. चहा .. कौतुक... गप्पा ... निरोप घेत ७ ला सोडलेलं सातारा... ८.३० ला कात्रज बोगदा ओलांडुन पुढचा होल्ट ठरल्या शिरवळ ला पुणे परगण्यातुन एकमेव सहभागी आणि मोहीम यशस्वी पार पाडल्यावर विशाल नायकवडीला दोस्तांच्या मिठीचा तासभर गप्पांचा सहृदय निरोप... अकराला तळेगावात शेवटचा ठरलेला जेवणाचा थांबा .. ईडिया ऑस्ट्रेलिया ची संपलेली match .. म्हणून जेवता लाभलेला पोस्ट match शो ...आळसावलेला देह... डोळ्यावर झोप..

थोडा आराम म्हणून मागे बसत संक्याच्या हाती दिलेली ... त्यालाही अनावर झोपेने पुन्हा त्याने घाटाआधी परत केली गाडी... खंडाळा - लोणावळा - खोपोली रस्त्यात झोप लागू नये म्हणून संक्यासोबत मोठ्याने हाणलेल्या शेजारून जात्या

गाड्यातही ऐकू जाव्या अशा गगनभेदी गप्पा... परत सकाळच्या पहिल्या गाडीने खेडकडे निघायंच म्हणुन पनवेल मध्ये उतरलेला संक्या आणि सुरज... रात्रीच्या अंधारात बाकी इतर आपापल्या रस्त्याने गेल्याची मागून आलेल्या आबाने दिली खबर ... बेलापूर ठाणे मुलुंड टप्प्याचे उरलेले आबा, जितु, सुबोध, मी आणि किरण आणि आमच्या तीन शेवटच्या गाड्या ...

अखेर पहाटे साडेतीनला गाठलेलं घर... मोबाईलवर सगळे सुखरूप पोचल्याचे निरोप.... बेडवर पडल्या पडल्या लागलेली.. आणि आताच तर पाच मिनिट झोपलो होतो असं वाटावं इतकी क्षणभर वाटली ५ तास झोप ... झोपेतलीच अंघोळ ... आणि अंगावर आलेली रोजची ३० किलोमीटर ची ऑफिस गाठण्याची मोहीम ... नित्यनेम सोमवार सकाळ.. ऑफिस.. काम.. काम... काम... आणि भटकंतीचा न उतरणारा hangover.

स्वराज्याच्या अभेद्य आरमाराच्या चिलखती ठरलेल्या कोकणातील 'तांबडया' वाटांना जोडणाऱ्या २६ किल्ल्यांना मानवंदना देत... इतिहासाचं वादळी वेड उरात घेऊन... धुरळा उडवत, "भटक्यांची धुळवड" विनाअट्टहास, उत्कृष्ट नियोजनाने, सुसंगता, एकत्रितता, समजूतदारपणाने .. सुखरूप अशी यथासांग साजरी.... साधे सुधे ट्रेकर्स मधल्या भटक्यांना अशाच ज्ञात-अज्ञात नव्या वाटा खुणावत आहेत... पुढच्या मोहिमेची वार्ता येईतो.. मुक्काम आणि निरोप .... जय शिवराय....!! धन्यवाद....!!





शेवटच्या संपुर्ण दिवसाच्या Route Map साठी इथे क्लिक करा

संदर्भ आणि ऋणनिर्देश :

प्रवासापूर्वीचे नकाशे, गड्किल्ल्यांची माहीती, तिथे पोहोचून अनुभवलेले इतिहास संदर्भ, आधीच नोंद करून ठेवल्याने कमी वेळात पाहता आलेले भूगोलाचे ठावठिकाणे... विकिपिडिया, गुगल map , सह... ट्रेकक्षितिज, रानवाटा, गडवाट अशा ट्रेकर्ससाठी उल्लेखनीय काम करणाऱ्या महत्वाच्या वेबसाईटस वरून घेण्यात आले.. त्याबद्दल ऋणी आहोत.

कसं काय मंडळी! मस्त आहात ना?

प्रवासाने शिणला असाल तर वांयच टेका इथे आणि चार गप्पा हाणा. मराठमोळी सुसाट दुर्गसफ़र म्हणजे चारधाम यात्राच. हे काही साईट्सिईंग नव्हे. हा मराठमोळ्या भक्तीचा दुसरा पैलू. पहिला पैलू म्हणजे टाळ मृदंगांच्या साथीने होणारी आषाढी कार्तिकी. ती भक्ती जेवढी अस्सल तेवढीच ही! आळंदी, देहू, पंढरपूर भक्ती आणि शांती देतात. तर काळ्या कातळातले हे गडकिल्ले शक्ती आणि स्फ़ुर्ती देतात. मराठी संस्कृतीचा हा पैलू दाखवणारं हे पुस्तक कसं वाटलं ते सांगा. कृपया आपली प्रतिक्रिया सचिन काकडे (9594566676) यांना कळवा. पुढच्या दुर्गसफ़रीत सामिल होण्यासाठी आबासाहेब कापसे (9870140114) यांच्याशी संपर्क ठेवा.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या दुर्गसाहित्यिकांमध्ये नचिकेत जोशी, माधुरी नाईक, सचिन काकडे, विशाल दळवी, पंकज घारे, संकल्प चौधरी, भास्कर नारकर, विठ्ठल गोरे असे एकाहून एक सरस लेखक आहेत. किल्ल्यांच्या पायऱ्या सुद्धा यांच्या पावलांची चाहूल ओळखतात इतके यांचे घनिष्ट संबंध झालेत. या दुर्गवेड्यांशी संपर्कात रहाण्यासाठी ई साहित्य चे VIP मेंबर व्हा. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षर लोकांचे ई मेल पत्ते आम्हाला कळवा. म्हणजे आम्ही तुम्हाला VIP मेंबर करतो. आणि त्यांनाही पुस्तकं पाठवतो.

आमचा पत्ता : esahity@gmail.com

आपले मित्र
टीम ई साहित्य प्रतिष्ठान